तात्काळ                                                  महाराष्ट्र शासन

क्र.प्रतिनि-२५१९/प्र.क्र.१७८/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र.२२७९४१७२/२२७९३३४४
दिनांक : ०५ डिसेंबर, २०१९

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिनिस्त
इतर शासकीय कार्यालय,
मंत्रालय, मुंबई-४०००३२

**विषय :-** महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई या कार्यालयातील **"सहायक"** हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

**संदर्भ :-** १) सा.प्र.वि., शा.नि. क्र.: एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ व १६.०२.२०१८
२) सा.प्र.वि.,शा.नि. क्र.: संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१७
३) अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. हज २०१९/प्र.क्र.२४८/का.५, दिनांक २२-११-२०१९ चे पत्र
४) महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांचे क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.९/एसएचसी/बी-१७८१, दिनांक २७-०८-२०१९ चे पत्र

महोदय/महोदया

सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२, दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदरहू कार्यपध्दतीस अनुसरुन अल्पसंख्याक विकास विभागाच्या अधिपत्त्याखालील महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई येथील "सहायक" हे रिक्त पद मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून भरण्याबाबत संदर्भाधिन क्रमांक ३ येथील प्रस्तावान्वये विनंती केली आहे. त्यास अनुसरुन खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ येथील पदावर मंत्रालयीन संवर्गातील सहायक कक्ष अधिकाऱ्यांकडून सदरहू पद प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता इच्छुकता मागविण्यात येत आहे :-

| अ.क. | महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई कार्यालयातील पदनाम | पदांची संख्या | मंत्रालयीन संवर्गातील पदनाम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | सहायक | १ | सहायक कक्ष अधिकारी |

२. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयीन विभागातील, सहायक कक्ष अधिकारी यांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा. कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत तसेच प्रत देखील अंकीत करु नये, थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही.

३. **महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई या कार्यालयात प्रतिनियुक्तीसाठी इच्छुक** मंत्रालयीन विभागातील, सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी खालील अटी व शर्तीची पूर्तता करणे आवश्यक आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| | | **सहायक पदांसाठी अटी व शर्ती** | |
| | | मंत्रालयीन विभागातील सहायक (आताचे नांव सहायक कक्ष अधिकारी) किंवा इतर शासकीय कार्यालयातील समकक्ष पदावर कार्यरत असलेला खालील अटींची पूर्तता करीत आलेला कर्मचारी | |
| | अ) | मान्यता प्राप्त विद्यापीठाची पदवी अथवा शासनमान्य तत्सम अर्हता. | |
| | ब) | वरील (अ) येथे उधृत केलेली अर्हता प्राप्त केल्यानंतरचा प्रशासकीय कामाचा किमान ५ वर्षाचा पर्यवेक्षीय अनुभव तसेच शासकीय लेखे ठेवण्याबद्दलचे ज्ञान. | |
| | क) | उर्दु, मराठी आणि इंग्रजी भाषेचे ज्ञान आवश्यक. | |

४. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दिनांक १२-१२-२०१९ पर्यंत पोहोचेल अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा:-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | शासन सेवेत प्रथम नियुक्तीचा दिनांक | |
| ४) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ५) | शैक्षणिक अर्हता | |
| ६) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ७) | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ८) | मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०१९ रोजीचे) | |
| ९) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| १०) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास त्याबाबतचा तपशील (पद, ठिकाण व कालावधी) | |
| ११) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |

५. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नाव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दिनांक १२-१२-२०१९ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

६. सद्य:स्थितीत शासनाने सरळसेवा भरतीवर निर्बंध घातले असल्याने, प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या पदावर तत्काळ कर्मचारी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही. तथापि, सरळसेवा व पदोन्नतीमधून ज्या प्रमाणात उमेदवार

उपलब्ध होतील त्या प्रमाणात विभागातील रिक्त पदांच्या टक्केवारीनुसार विभागास, सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील कर्मचारी उपलब्ध करुन देण्यात येतील याची विभागांनी नोंद घ्यावी.

७. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवरील संदेशफलक या टॅबखाली प्रसिध्द करण्यात येत आहे.

८. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२०६१११६२२०९०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.12.06 11:19:24 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, यांचे कार्यालय, तळमजला, साबु सिद्दीक मुसाफिरखाना, क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई-४००००१ यांना माहितीस्तव सादर.

२) उप सचिव (का.५) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

३) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ)